**सहनियंत्रक, वैधमापन शास्त्र, कोकण विभाग या कार्यालयाच्या दुरूस्ती व नुतनीकरणासाठीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२४/३६८/प्र.क्र.७२/ग्रा.सं.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ** - १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दि.१७/०४/२०१५
२) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.काजा (२८) /१४२४/प्र.क्र.३७० /वैमाशा-२/१०१२, दिनांक २४/१२/२०२४
३) कार्यकारी अभियंता यांचे कार्यालय, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांचे पत्र क्र. जा.क्र.साबांवि/पनवेल/प्रशा-१/७२३३, दिनांक २९/११/२०२४

**प्रस्तावना :-** नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्र.२ अन्वये सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभागीय कार्यालयाच्या दुरूस्ती व नुतनीकरणासाठी रूपये ३२,०९,९७६/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मंजुरी व निधी उपलब्ध करून देण्याकरीता शासनास सादर केले आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभागीय कार्यालयाच्या दुरूस्ती व नुतनीकरणासाठी रूपये ३२,०९,९७६/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मंजुरी व निधी उपलब्ध करून देण्याकरीता शासनास सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी सन २०२२-२३ च्या दरसुचीनुसार तयार केले असून सदर अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल विभाग व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड, कोकण भवन, नवी मुंबई यांची तांत्रिक सहमती घेण्यात आलेली आहे. त्यानुसार **सह नियंत्रक, वैधमापन शास्त्र, कोकण विभागीय कार्यालयाच्या दुरूस्ती व नुतनीकरणासाठी रूपये ३२,०९,९७६/- (रूपये बत्तीस लाख नऊ हजार नऊशे शहात्तर मात्र) इतक्या खर्चाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.**

२. उपरोक्त प्रयोजनार्थ या आदेशान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये रूपये ३२,०९,९७६/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर प्रयोजनार्थ सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभागीय कार्यालयातील उपनियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत असून त्यांनी सदर निधी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल कोकण भवन, नवी मुंबई यांचेकडे हस्तांतरीत करावा.

३. उपरोक्त खर्च मागणी क्र. एम-५ मुख्य लेखाशिर्ष ५४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च (८००) इतर खर्च (००) (०१) वजने व मापे मुलभूत सुविधांचे बळकटीकरण (योजनांतर्गत) (५४७५-०२४८) ५३, मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम(भाग-२), दि.१७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका, परिच्छेद क्र.१३४(१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३०७१८३२४६२४०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.03.07 18:33:40 +05'30'

**(पूजा मानकर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं. विभाग, मुंबई.

३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल, कोकण भवन, नवी मुंबई.

४. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

५. महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

७. सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभाग, मुंबई

८. वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.

९. निवडनस्ती, (ग्रा.सं.-३)